पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना
सेवांतर्गत प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध
करुन देण्यास मंजूरीबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक टिईएक्स ०३०४/प्र.क्र.१५६/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई-३२. दिनांक:- २३ ऑगस्ट, २००५.

वाचा:१. शासन निर्णय, समक्रमांक, दि. १४ जानेवारी, २००५.
२. शासन निर्णय, समक्रमांक, दि.२९ मार्च, २००५.
३. शासन निर्णय, समक्रमांक, दि.३१ मार्च, २००५.
४. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा.पत्र क्रमांक टीआरजी/ईएसएच-रोमण एक/आयएसटी/०५/२१३१,दि. ४ जून, २००५.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक, प्रशिक्षण व खास पथके,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. प्रशिक्षण/आस्था-१/सेवांतर्गत प्रशिक्षण/२००५/१८५६, दि. १६ मे,२००५ व दि. ७ जुलै, २००५

**शासन निर्णय:-**

राज्यातील पोलीस दलातील अधिकारी व कर्मचारी यांना त्यांच्या जिल्हा मुख्यालयाच्या/आयुक्तालयाच्या ठिकाणी सेवांतर्गत प्रशिक्षण देण्याच्या प्रस्तावास शासन निर्णय, समक्रमांक, दि. १४ जानेवारी, २००५ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयासाठी रु. ७५ लाख (रुपये पंचाहत्तर लाख फक्त) व राज्यातील अन्य सर्व पोलीस आयुक्तालये/जिल्हा पोलीस मुख्यालये यांच्यासाठी रु.२.४० कोटी (रुपये दोन कोटी चाळीस लाख फक्त) व पोलीस प्रशिक्षण विद्यालये यासाठी रु. ४० लाख (रुपये चाळीस लाख फक्त) इतकी रक्कम मजूर करण्यात आलेली आहे.

२. तसेच शासन निर्णय, समक्रमांक, दि. २९ मार्च, २००५ अन्वये, संदर प्रशिक्षण कार्यक्रमासाठी राज्यातील बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाव्यतिरिक्त इतर सर्व पोलीस आयुक्तालये/जिल्हा पोलीस मुख्यालये यांच्यासाठी मंजूर करण्यात आलेली रु.२.४० कोटी (रुपये दोन कोटी चाळीस लाख फक्त) इतकी रक्कम संक्षिप्त देयकाव्दारे काढण्यास एक विशेष बाब म्हणून शासनाची मान्यता देण्यात आलेली आहे.

३. संक्षिप्त देयकावर काढण्यात आलेल्या रु. २ कोटी ४० लाख एवढया रक्कमेची तपशीलवार देयके एका महिन्याच्या आत लेखा परिक्षा अधिका-यांकडे सादर

होणे आवश्यक होते. तथापि, दरम्यानच्या कालावधीत सर्व पोलीस घटकप्रमुख पोलीस शिपाई भरती, कायदा व सुव्यवस्था आदि कामात व्यस्त असल्याने, सदर रक्कम खर्ची करुन त्याची तपशिलवार देयक सादर करण्यास मुदतवाढ देण्याची विनंती पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केली आहे. त्यानुसार, संक्षिप्त देयकावर काढण्यात आलेल्या रक्कमेची तपशिलवार देयके सादर करण्यास दि.३१.१२.२००५ पर्यन्त मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. तसेच, पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना सेवातंर्गत प्रशिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या निधीतून मल्टिमिडीया प्रोजेक्टर व इतर प्रशिक्षण साहित्य, विहित पध्दतीने, खरेदी करण्यास परवानगी देण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर ३११/०५/ व्यय-७, दि.१९.८.२००५ व क्रमांक ४११/०५/विनियम, दि. ६/८/२००५ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र. ता. गौड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
विशेष पोलीस महानिरीक्षक (प्र.व खा.प.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-७),
निवड नस्ती (पोल-५अ)